तथापि ते उतारे त्याच्या कोशाच्या मुद्रित आवृत्तींत उपलब्ध होत नाहींत अशी स्थिति आहे.

प्रसंगीं टीकाकार चरक, व्याडि, रभस, सज्जन, सारस्वत आणि इतर प्राचीन कोशकार यांच्या ग्रंथांतून उतारे देतात. हे ग्रंथ उपलब्ध झालेले नाहींत. टीकात्मक वाङ्मयांत तसेंच निरनिराळ्या कोशांत सांपडणारीं अशा ग्रंथांतील उद्धरणें जर एकत्र केलीं तर या ग्रंथांचें स्वरूप कसें असावें याचे कांहीं अंशीं दिग्दर्शन करतां येईल. निदान त्यांत उद्धृत केलेल्या शब्दांची सूची करून त्यांच्या अर्थांची चिकित्सा करतां येईल.

( अ ) नानार्थार्णवसंक्षेपामध्यें "सज्जन" कोशांतून घेतलेल्या (अवतरणांतील ) शब्दांच्या संभाव्य सूचीचें स्वरूप पुढीलप्रमाणें राहील:—

अत्ता; स्त्री. १-१०-४. नाट्योक्तौ वृद्धा वेश्या
अनुबन्ध; पु. ३-८-८६. क्रोध
अभिषङ्ग; पुं. ३-७-८. दुःख
अभिहार; पुं. ३-६-४ संश्लेषण, अभिक्रमण
आरिष्ट; न. २-४८-१७ अञ्जनाभवर्ण, निकार
अवदात; न. २-१८-४ अप्रधानकर्मन्
आडम्बर; पुं. ३-३०-५९. क्रोध, आभोग
आशय; पुं. २-६२-१८४. संघ; चेतस्
आशा; स्त्री. १-४८-६४. समीप
इज्या; स्त्री. १-११-१३ जननी
उपला; स्त्री. २-६७-२४ दिश्
कट; पुं. १-५६-१५७ वलय
काली; स्त्री. १-५८-१८२. शासनदेवता
कुंड; न. १-६३-२३६. कुंभ
कुतप; पुं. न. २-८९-४९६. सायमास्तरण
कुब्ज; वि. १-६२-२३१. निखर्व
खेट, पुं. न. १-७०-३२१ नद्यद्रिमध्यस्थनगर
गत; वि. १-७१-३३६ अतीत
गौरी; स्त्री. १-७५-३८०. शासनदेवता
चर्चिका; स्त्री. १-७७-४०१. पार्वतीनाम
चाढ; पुं. १-७८-४१५. दर्वी
जन; पुं. १-८२-४६४. अप्राज्ञ मनुष्य